**<u>कोषागारात रोख रकमेत देय</u>**

**<u>केंद्र सहाय्यीत योजनांतर्गत शौचालय बांधणे</u>**
**सन २००९-१० करिता राज्य हिश्श्याच्या**
**अनुदानाचे वितरण (स्टेटपूल) (२२१५ २१८९)**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय : अनुदान २००९ /प्र.क्र. १०१ /पापु १६**
**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,दिनांक:- २९ जुलै, २००९**

वाचा : या विभागाचा शासन निर्णय क्र. अनुदान २००९ /प्र.क्र. १०१ /पापु १६, दि. २१.४.२००९.

**<u>प्रस्तावना:</u>**

सन २००९-१० या आर्थिक वर्षाकरीता स्टेटपुल खाली रु. २९९.५१ लाखाचा अर्थसंकल्प विधीमंडळास मंजूरीसाठी सादर करण्यात आला होता. संपुर्ण अर्थसंकल्पास मंजुरी मिळेपर्यंतचा चार महिन्यांचा खर्च भागविण्यासाठी विधानमंडळाने महाराष्ट्र विनियोजन ( लेखानुदान ) विधेयक, २००९ मंजुर केले आहे. सदरचे विधेयक आता अधिनियमात रूपांतरीत झाले असुन ते महाराष्ट्र अधिनियम क्र. ९ म्हणून महाराष्ट्र शासन राजपत्र असाधारण भाग - ४, दि. २३ मार्च, २००९ यामध्ये प्रसिध्द करण्यात आले आहे. सदर उपलब्ध निधी वितरीत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. याबाबत पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात आलेला आहे.

**<u>शासन निर्णय :-</u>**

सन २००९-१० या आर्थिक वर्षाकरीता केंद्र पुरस्कृत संपूर्ण स्वच्छता कार्यक्रमाच्या राज्य हिश्श्यासाठी (शौचालय बांधकाम) स्टेटपूल खाली चार महिन्यांसाठी रु. २९९.५१ लाख अर्थसंकल्पीत केलेले आहे. त्यापैकी रक्कम रु.१००.०० लाख इतके अनुदान शासन निर्णय क्र. अनुदान १००९/प्र.क्र. १०१ /पापु-१६, दि. एप्रिल, २००९ अन्वये वितरीत करण्यात आलेले आहे. तथापि सदर रक्कम मासिक संगणकीय अर्थसंकल्प वितरण प्रणालीव्दारे निधी जुलै, २००९ या महिन्यात उपलब्ध झाल्याने उक्त शासन निर्णयातील रक्कम या महिन्यात वितरीत करण्यात येत आहे. सन २००९-१० या आर्थिक वर्षाकरीता केंद्र पुरस्कृत संपूर्ण स्वच्छता कार्यक्रमाच्या राज्य हिश्श्यासाठी (शौचालय बांधकाम) स्टेटपूल खाली चार महिन्यांसाठी अर्थसंकल्पीत केलेल्या रु. २९९.५१ लाख तरतूदीतून उर्वरित रक्कम रु. १९९.५१ लाख ( रू. एक कोटी नव्याण्णव लाख एक्कावन्न हजार फक्त) इतके अनुदान सोबत जोडलेल्या विवरणपत्रानुसार तसेच शासन निर्णय समक्रमांक दि. २१ एप्रिल, २००९ अन्वये वितरीत केलेली रक्कम रू. १००.०० लाख अशारितीने एकुण रक्कम रू. २९९.५१ लाख ( रू. दोन कोटी नव्याण्णव लाख एक्कावन्न हजार फक्त) माहे जुलै, २००९ करीता २२१५ २१८९ या लेखाशिर्षाखाली संबंधीत जिल्हा परिषदांच्या मुख्य कार्यकारी अधिकारी यांना संगणकीय अर्थसंकल्प वितरण प्रणालीव्दारे रोख स्वरुपात मुक्त करण्यात येत आहे.

२. हा खर्च मागणी क्रमांक "वाय-२, २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता ०२, जलनिस्सारण व स्वच्छता- १०७ मलप्रणाली सेवा- ग्रामीण स्वच्छता ग्रामसफाई कार्यक्रमांतर्गत अर्थसहाय्य

(राज्यपुरस्कृत योजना )- (०२) (०५) केंद्र सहाय्यीत योजनेंतर्गत शौचालय बांधणे (राज्य हिस्सा) (२२१५ २१८९) ३३ अर्थसहाय्य " या लेखाशिर्षाखाली घालावा.

३. या शासन निर्णयाखालील अनुदान पुढील अटीवर मंजूर करण्यात येत आहे.

अ) या शासन निर्णयाव्दारे मंजूर केलेले अनुदान ज्या कारणासाठी मंजूर करण्यात आले आहे त्याच कारणासाठी खर्च करण्यात यावे. मात्र संपुर्ण स्वच्छता कार्यक्रमाखालील जिल्हा परिषदांनी या शासन निणर्याव्दारे मुक्त केलेला निधी, या कार्यक्रमासाठी उघडलेल्या स्वतंत्र बँक खात्यात जमा करून संपुर्ण स्वच्छता कार्यक्रमाच्या केंद्र शासनाने निर्देशित केल्यानुसार कालावधीत आवश्यकतेनुसार वापरावा.

ब) संबंधित जिल्हा परिषदेने या शासन निर्णयाव्दारे मंजूर करण्यात आलेल्या अनुदानापेक्षा जास्त खर्च करू नये.

क) अट क्रमांक ३-अ आणि ३-ब यांची पूर्तता झाली आहे याची खात्री करण्यासाठी महालेखापाल -१, मुंबई व महालेखापाल-२ नागपूर यांच्याकडे तपासणीसाठी जिल्हा परिषदेच्या संबंधित अधिकारी/कर्मचारी याना लेखे तपासणीसाठी सर्व कागदपत्रे उपलब्ध करून द्यावेत.

ड) या शासन निर्णयाची पोचपावती प्रत्येक जिल्हा परिषदेने शासनास पाठवावी.

इ) ग्रामीण स्वच्छता कार्यक्रमाचा विहीत नमुन्यातील मासिक प्रगती अहवाल प्रत्येक जिल्हा परिषदेने महिन्याच्या ५ तारखेपर्यंत पाठविण्याची दक्षता घ्यावी.

फ) सदर रक्कम खर्च झाल्यानंतर त्याचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास त्वरित सादर करावे.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक क्र.अंदाज १०.०९/प्र.क्र. ९०/२००९/अर्थसंकल्प ३, दिनांक २३ मार्च, २००९ अन्वये प्रशासकीय विभागांना मासिक निधी वितरणाबाबत प्रदान केलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे. सदर निधी मासिक निधी विवरणानुसारच आहे.

**५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २००९०७२९१८१६५८००१ असा आहे.**

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

**( सं. शा. कांबळे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

प्रति,

१) विभागीय आयुक्त, कोकण, पुणे, औरंगाबाद, नागपुर विभाग.
२) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,ठाणे, रायगड, सातारा, सांगली,कोल्हापुर,परभणी, हिंगोली व चंद्रपुर.
३) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, ठाणे, रायगड, सातारा, सांगली,कोल्हापुर,परभणी, हिंगोली व चंद्रपुर.
४) जिल्हाधिकारी व सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती, ठाणे, रायगड, सातारा, सांगली, कोल्हापुर, परभणी, हिंगोली व चंद्रपुर.
५) जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे, रायगड, सातारा, सांगली,कोल्हापुर,परभणी ,हिंगोली व चंद्रपुर.

६) महालेखापाल-१/२, मुंबई/नागपूर (लेक्षापरिक्षा व अनुज्ञेयता)
७) नियोजन विभाग, (का.क्र. १४४३) मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
८) वित्त विभाग, (अर्थोपाय) मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
९) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई
१०) उपमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, ठाणे, रायगड, सातारा, सांगली,कोल्हापुर,परभणी हिंगोली व चंद्रपुर.
११) संचालक, लेखा व कोषागार, मुंबई - ४०० ०३२.
१२) कार्यासन क्रमांक पापु-०४ व पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१३) निवड नस्ती, कार्यासन क्रमांक पापु-१६.

**शासन निर्णय क्र. अनुदान २००९ /प्र.क्र. १०१/पापु-१६, दिनांक:- २९ जुलै, २००९ सोबतचे विवरणपत्र**

(रु. लाखात)

| अ. क्र. | जिल्हा परिषद | अर्थसंकल्पिय तरतुद (राज्य हिस्सा) (स्टेटपूल) | या शासन निर्णयान्वये मुक्त तरतूद | |
|---|---|---|---|---|
| | | | अंकी | अक्षरी |
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १. | ठाणे | ४०.०० | ४०.०० | ( रु. चाळीस लाख फक्त ) |
| २. | रायगड | ५०.०० | ५०.०० | ( रु. पन्नास लाख फक्त ) |
| ३. | सांगली | २२.८६ | ९.५१ | ( रु. नऊ लाख एक्कावन्न हजार फक्त ) |
| ४. | परभणी | ४०.०० | ४०.०० | ( रु. चाळीस लाख फक्त ) |
| ५. | हिंगोली | ४०.०० | ४०.०० | ( रु. चाळीस लाख फक्त ) |
| ६. | चंद्रपुर | २०.०० | २०.०० | ( रु. वीस लाख फक्त ) |
| | **एकूण** | **२१२.८६** | **१९९.५१** | **(रू.एक कोटी नव्याण्णव लाख एक्कावन्न हजार फक्त )** |

**शासन निर्णय क्र. अनुदान २००९/प्र.क्र. १०१/पापु-१६, दिनांक:- २१ एप्रिल, २००९ सोबतचे विवरणपत्र**

(रु. लाखात)

| अ. क्र. | जिल्हा परिषद | अर्थसंकल्पिय तरतुद (राज्य हिस्सा) (स्टेटपूल) | या शासन निर्णयावये मुक्त तरतूद | |
|---|---|---|---|---|
| | | | अंकी | अक्षरी |
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १. | सातारा | ६०.०० | ६०.०० | (रु साठ लाख फक्त ) |
| २. | कोल्हापुर | ४०.०० | ४०.०० | (रु चाळीस लाख फक्त ) |
| | **एकूण** | **१००.००** | **१००.००** | **(एक कोटी फक्त )** |

**( सं. शा. कांबळे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**